राज्यातील विनाअनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षणशास्त्र व शारिरीक शिक्षण महाविद्यालयांचे शिक्षण शुल्क निर्धारित करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शुल्क-५२१५/प्र.क्र.४३४/मशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २२ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा** :- शासन निर्णय क्रमांक :शुल्क-२०१५/प्र.क्र.४३४/१५/मशि-२, दिनांक १९ जानेवारी, २०१६.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विनाअनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षणशास्त्र व शारिरीक शिक्षण महाविद्यालयांतील बी.एड, एम.एड, बी.पी.एड व एम.पी.एड अभ्यासक्रमांचे शुल्क निश्चित करण्यासाठी एकच शिक्षण शुल्क समिती गठीत करण्याचा निर्णय संदर्भाधीन दिनांक १९ जानेवारी, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. सदर समितीवर नामनिर्देशित सदस्य म्हणून खाजगी शिक्षक प्रशिक्षक संघटनेचा प्रतिनिधी (शारीरिक शिक्षणशास्त्र) यांची सदस्य म्हणून नियुक्त करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन सदर समितीवर खाजगी शिक्षक प्रशिक्षक संघटनेचा प्रतिनिधी (शारीरिक शिक्षणशास्त्र) यांची सदस्य म्हणून नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

राज्यातील विनाअनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षणशास्त्र व शारिरीक शिक्षण महाविद्यालयांतील अभ्यासक्रमांचे शिक्षण शुल्क निश्चित करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीवर श्री. आर. एम. कडू, प्राचार्य, श्री शिवाजी बी.पी.एड महाविद्यालय, अमरावती यांची नामनिर्देशित सदस्य म्हणून नियुक्त करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२२१७१८०००३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Urmila Vaibhav Joshi

Digitally signed by Urmila Vaibhav Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Urmila Vaibhav Joshi
Date: 2017.02.22 17:19:29 +05'30'

**(उर्मिला जोशी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. प्रधान सचिव, (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई,
४. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सदस्य सचिव, शिक्षण शुल्क समिती, मुंबई,
८. सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण,
९. सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलसचिव,
१०. श्री आर. एम. कडू, प्राचार्य, श्री शिवाजी बी.पी.एड महाविद्यालय,अमरावती,
(संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत)
११. सर्व प्राचार्य, शारिरीक शिक्षण महाविद्यालये
(संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत)
१२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
१३. महालेखापाल,(लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५. मा. मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६. मा. राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७. प्रधान सचिव ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (मशि-२).